# सूपमध्ये मिरची कोणी टाकली?

लेखिका: जोॲना कोल

चित्रे: आर. डब्ल्यू. ॲले

मराठी अनुवाद: सुशील मेन्सन



*सू* आई आणि *जो* बाबा यांचं जुनं मोठं शेत होतं. शेतात सर्वत्र तण माजलं होतं. त्यांचं जुनं लहानसं घरसुद्धा होतं. घराच्या भिंतींवरचा रंग पार उडून चालला होता. त्यांना बरीच मुलं होती. ती अंगावरच्या कपड्यांच्या तुलनेत लवकर मोठी होत होती. आई-बाबा आपल्या मेहनतीच्या बळावर मानाने जगत होते.



एकदा त्यांना एक पत्र आलं. त्यांची श्रीमंत *टूटी* मावशी त्यांच्याकडे रात्री जेवायला येणार होती.

“गरीब असलो म्हणून काय झालं! आपण एक चविष्ट सूप बनवू. असं सूप मावशीने तिच्या उभ्या आयुष्यात कधी चाखलं नसेल,” सू आई म्हणाली.



“मावशी श्रीमंतीत वाढलीय. आपल्या या गरीबखान्याकडे बघून तिला काय वाटेल?” जो बाबांना काळजी वाटू लागली.

सूप बनवायला घरातल्या प्रत्येकाने मदत केली. जो बाबाने मांस आणलं. *सॅम*ने कांदे-बटाटे कापून दिले. *टॉबी* आणि *जेन*ने गाजरं कापली. सर्व जिन्नस त्यांनी एका भांड्यामध्ये ठेवलेल्या पाण्यात टाकलं. सू आईने भांडं चुलीवर ठेवलं.



मग बाबा म्हणाले, “चला, मी तुम्हाला कामं वाटून देतो.” त्यांनी सर्वांना वेगवेगळी कामं नेमून दिली.

सू आई अंगणात कपडे धुऊ लागली. अचानक चुलीवर ठेवलेल्या सूपला उकळी फुटल्याचा आवाज आला. आपण सूपमध्ये मिरची टाकायला विसरलो, हे तिच्या लक्षात आलं. मिरची घातल्याशिवाय सूप चविष्ट कसं बनेल?



"जो, ऐक ना! चुलीवरच्या सूपमध्ये थोडी मिरची टाकून येतोस का?" सू म्हणाली.



"मला वेळ नाही सू. मी लाकडं तोडतोय," जो म्हणाले.

"आता काय करावं?" सू आई म्हणाली.



सूप उकळण्याचा आवाज वाढू लागला.

“सॅम, जरा चुलीवरच्या सूपमध्ये मिरची टाकतोस का?” सू आईने सॅमला सांगितलं.



“अगं आई, मी खिडक्या साफ करतोय. मला काही सांगू नकोस,” सॅम उत्तरला.

“काय करावं?” सू आईला प्रश्न पडला.



आता सूप आणखी जोरात उकळू लागलं.

“टॉबी, जेन, कुणीतरी जाऊन चुलीवरच्या सूपमध्ये मिरची टाकेल का?” सू आईने आरोळी दिली.



टॉबी आणि जेन बागेतून मोठ्याने म्हणाले, “आम्ही गवत कापत आहोत. आता येऊ शकत नाही.”

“काय करावं?” सू आई चिंतेत पडली. तिचे दोन्ही हात कोपरापर्यंत साबणाच्या फेसात बुडालेले होते. त्यामुळे ती सूपमध्ये मिरची टाकू शकत नव्हती.



आता चुलीवरच्या भांड्यातलं सूप आणखी जास्त उकळू लागलं.

थोड्या वेळाने जो बाबांचे लाकूड तोडण्याचे काम संपलं. ते मनाशी म्हणाले, “चला, आता चुलीवरच्या सूपमध्ये मिरची टाकू.”



मग स्वयंपाकघरात जाऊन त्यांनी सूपमध्ये एक मिरची टाकली.



म्हणून, स्वयंपाकघरात जाऊन त्याने सूपमध्ये दोन मिरच्या टाकल्या.




थोड्या वेळाने सॅम स्वत:शी म्हणाला, “खिडकी साफ करून झाली. आता चुलीवरच्या सूपमध्ये मिरची टाकतो.”

थोड्या वेळाने टॉबी आणि जेनचे गवत कापून झाले. “चला, आता सूपमध्ये मिरची टाकू,” ते म्हणाले.



मग स्वयंपाकघरात जाऊन त्यांनी सूपमध्ये तीन मिरच्या टाकल्या.



थोड्या वेळाने सू आईने विचार केला, “सूपमध्ये मिरची टाकायला सगळ्यांना विचारून झालं. पण सगळेच नाही म्हणाले. आता मीच जाऊन टाकून येते. सूप खूप जास्त आहे, तेव्हा थोडी जास्तच मिरची टाकते त्यात.”

मग सू आईने स्वत: स्वयंपाकघरात जाऊन सूपमध्ये चार मिरच्या टाकल्या. “आता सूप अगदी चविष्ट होईल,” ती मनाशी म्हणाली.





जेवणाची वेळ होईपर्यंत, कपडे धुऊन झाले होते, गवत कापून झालं होतं, लाकडं तोडून झाली होती, खिडक्या साफ करून झाल्या होत्या आणि सूपाचा खमंग वास सुटला होता.

टूटी मावशी आली तेव्हा सगळे नवे कपडे घालून बसले होते. सर्वांनाच खूप भूक लागली होती. सर्वांनी टूटी मावशीला अभिवादन केलं. त्यांनी मावशीला बसायला सगळ्यात चांगली खुर्ची दिली. तिला भेग न पडलेली थाळी दिली. सू आईने भांड्यातलं सूप तिच्या थाळीत वाढलं.



टूटी मावशी सूप तोंडात कधी टाकतेय, याची वाट बघत सगळे थांबले. मावशीने सूप चमच्यात घेतलं आणि तोंडात टाकलं.





अरे बापरे! किती भयानक चेहरा केला मावशीने!

मावशीने एक दीर्घ श्वास घेतला, ती थोडं पाणी प्याली, तिच्या डोळ्यातून थोडं पाणी आलं. मग तिने टेबलच्या सभोवार पाहिलं.



“सूपमध्ये मिरची कोणी टाकली?”
ती किंचाळली.

सू आई, जो बाबा, सॅम, टॉबी आणि जेन हे सगळे एकाच वेळी ओरडले,
“मी सूपमध्ये मिरची टाकली.”

मग सगळ्यांनी सूपची चव घेतली. “बापरे!” सगळे टूटी मावशीच्या चेहऱ्याकडे पाहू लागले. तिला खूप राग आलेला दिसत होता. पण ती आपलं हसू लपवत होती, हे टॉबी आणि जेनच्या लक्षात आलं. मग फिदीफिदी हसण्याचा आवाज आला. हा आवाज आणखी मोठा झाला, मग आणखी मोठा! काही क्षणात, सगळेच मोठमोठ्याने हसू लागले.



“हे सूप कुणी पिऊ शकणार नाही,”
जो बाबा म्हणाले.



“चला, दुसरा एखादा पदार्थ बनवू,”
सू आई म्हणाली.



“माझं आवडतं ऑमलेट बनवू,” टूटी मावशी
म्हणाली.



टूटी मावशीने आपले बूट काढले.

तिने एक एप्रन घातलं.

तिने अंडी मागितली.

तिने कांदे मागितले.

तिने ओवा मागितला.

तिने तुळस, टोमॅटो, मीठ आणि
मिरची मागितली.



“काय?”

“मिरची?”

“माफ करा, टूटी मावशी!”

“घरात नावालासुद्धा मिरची
उरली नाही.”
“अरे देवा!”

समाप्त